महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मौजे काष्टी, ता. मालेगांव, जि .नाशिक येथे कृषि विज्ञान संकुल स्थापना करणे, त्या अंतर्गत शासकीय महाविद्यालये स्थापन करणे आणि सन २०२०-२१ पासून शासकीय कृषि व्यवसाय व्यवस्थापन महाविद्यालय सुरु करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : मफुकृवि -१४२०/प्र.क्र. ६४ /७-अे,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २१ सप्टेंबर, २०२०.

**प्रस्तावना -:**

कृषि विकासात कृषि शिक्षणाचे महत्व असाधारण आहे. राज्यातील शेतकऱ्यांचे कृषि विषयक समस्यांचे वैज्ञानिक दृष्टया अध्ययन करुन कृषि विस्तार तंत्रज्ञानाद्वारे त्याचा प्रचार व प्रसार करणे तसेच शेतकऱ्यांच्या समस्या कृषि विद्यापीठ अर्थात विविध विषयासाठी निर्माण केलेल्या अध्यापन क्षेत्र असलेल्या महाविद्यालयात संशोधन व उकल होण्यासाठी पाठविणे आवश्यक आहे. त्याअनुषंगाने नाशिक जिल्हयातील मालेगाव तालुक्यातील काष्टी येथे कृषि विज्ञान संकुल स्थापन करण्याचे निश्चित करण्यात आले आहे.

२. शासनाच्या धोरणानुसार नाशिक जिल्हयात सद्य:स्थितीत एकही शासकीय कृषि व कृषि संलग्न महाविद्यालय अस्तित्वात नाही. या भागातील शेती व संबंधित क्षेत्राच्या विकासासाठी काष्टी, मालेगांव येथे कृषि व संलग्न महाविद्यालयाची स्थापना करणे आवश्यक आहे.

३. महाराष्ट्र विधानमंडळाचे अर्थसंकल्पीय अधिवेशन, २०२० मध्ये मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री (वित्त व नियोजन) व राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांनी अर्थसंकल्पाच्या उत्तरात याबाबत घोषणा केली आहे. त्याअनुषंगाने मा. कृषि मंत्री यांनी देखिल काष्टी, ता. मालेगांव, जि. नाशिक परिसरातील शेतकरी व जनतेच्या मागणीनुसार कृषि, उद्यानविद्या व अन्नतंत्रज्ञान या महाविद्यालयांच्या स्थापनेबाबत शिफारस केलेली आहे. मौजे काष्टी, ता. मालेगांव जि. नाशिक येथे शेती महामंडळाची २५० हे. जमीन यासाठी उपलब्ध आहे. सदर जमिनीवर कृषि विज्ञान संकुल निर्मिती करुन शासकीय कृषि महाविद्यालय, उद्यानविद्या महाविद्यालय, अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय, कृषि व्यवसाय व्यवस्थापन महाविद्यालय आणि कृषि अभियांत्रिकी व तंत्रज्ञान महाविद्यालय स्थापना करण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे.

४. मौजे काष्टी, ता. मालेगांव जि.नाशिक येथे कृषि विज्ञान संकुल अंतर्गत कृषि पूरक उद्योग विकास, प्रक्रिया केंद्र, शेतकरी प्रशिक्षण केंद्र व सुविधा केंद्र, आदर्श रोपवाटीका संकुल, सर्व कृषि निविष्ठांचे संशोधन व निर्माण केंद्र, कृषि संशोधन प्रकल्प व उपक्रम विकसित करणे अपेक्षित आहे. तसेच भविष्यात कृषि व संलग्न शाखांचे पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रम देखील या कृषि विज्ञान संकुलात

सुरु करण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे. यामुळे नाशिक जिल्हयात कृषि शिक्षणाच्या संधी उपलब्ध होतील. तसेच हे कृषि विज्ञान संकुल राज्यातील कृषि शिक्षणाचा आदर्श परिसर म्हणून विकसित करण्यात येईल. त्या दृष्टिने सदर प्रस्ताव कृषि विद्यापीठाने मान्यतेसाठी सादर केला आहे. सदर कृषि विज्ञान संकुल अंतर्गत शासकीय कृषि महाविद्यालय, उद्यानविद्या महाविद्यालय, अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय, कृषि व्यवसाय व्यवस्थापन महाविद्यालय आणि कृषि अभियांत्रिकी व तंत्रज्ञान महाविद्यालय स्थापन करण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे. त्यापैकी कृषि व्यवसाय व्यवस्थापन महाविद्यालय सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षापासून सुरु करण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे. मौजे काष्टी, ता. मालेगांव जि.नाशिक येथे कृषि विज्ञान संकुल निर्मितीसाठी महाराष्ट्र राज्य शेतीमहामंडळ, रावळगांव यांचे नावे असलेली २५०.०० हे. जमिन उपलब्ध करुन देण्याबाबत महसूल व वन विभागास प्रस्ताव सादर करण्यात आलेला आहे.

५. उक्त महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मौजे काष्टी, ता. मालेगांव, जि. नाशिक येथे कृषि विज्ञान संकुल निर्मिती अंतर्गत शासकीय महाविद्यालये स्थापन करण्याबाबतच्या प्रस्तावास दि.१८.०६.२०२० रोजी संपन्न झालेल्या विद्यापीठाच्या विद्या परिषदेमध्ये आणि दि. २२.०६.२०२० रोजी संपन्न झालेल्या कार्यकारी परिषदेमध्ये मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे.

६. सदर प्रस्तावास राज्य कृषि परिषदेच्या दि.०३.०७.२०२० रोजी संपन्न झालेल्या १०३ व्या बैठकीमध्ये ठराव क्र. ०२/१०३/२०२० मान्यता प्रदान करुन शासनाकडे शिफारशीत करण्यात आला.

७. महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मौजे काष्टी, ता. मालेगांव, जि. नाशिक येथे कृषि विज्ञान संकुल निर्मिती अंतर्गत शासकीय महाविद्यालये स्थापन करण्याबाबत राज्यमंत्रिमंडळाच्या दि.२६.०८.२०२० रोजीच्या बैठकीत विषय क्र.१० यावर खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

## शासन निर्णय :-

७.१ महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेच्या मुळ शिफारशीनुसार संकुलातील प्रस्तावित कृषि महाविद्यालय, उद्यानविद्या महाविद्यालय, कृषि अभियांत्रिकी व तंत्रज्ञान महाविद्यालय, कृषि व्यवसाय व्यवस्थापन (ABM) महाविद्यालय आणि अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय या महाविद्यालयांना तत्वत: मान्यता देण्यात आली आहे.

७.२ वित्त विभागाने सहमती दिल्याप्रमाणे काष्टी, ता. मालेगांव, जि. नाशिक येथील कृषि विज्ञान संकुलामधील Phase-I मध्ये कृषि व्यवसाय व्यवस्थापन महाविद्यालय (ABM) व Phase-II मध्ये अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय (Food Technology) हे अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७.३ सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षापासून कृषि व्यवसाय व्यवस्थापन (ABM) अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्यात येत असुन प्रस्तुत अभ्यासक्रम हा चार वर्षाचा असुन त्याची प्रवेश क्षमता प्रतिवर्षी ४० इतकी राहिल.

७.४ कृषि व्यवसाय व्यवस्थापन (ABM) अभ्यासक्रम सुरु करण्यासाठी शिक्षकवर्गीय पदे -३२, शिक्षकेतर पदे- ३५, बाहयस्त्रोत- ९ अशा एकूण -७६ पदांस मान्यता देण्यात येत आहे.

७.५ Phase-I व Phase-II करीता आवर्ती खर्च रु.१८० कोटी व अनावर्ती खर्च रु.७० कोटी अशा एकुण रु.२५० कोटी रुपये खर्चास पैकी Phase-I साठी आवर्ती खर्च रु.७३ कोटी व अनावर्ती खर्च रु.३० कोटी अशा एकुण रु.१०३ कोटी साठी मान्यता देण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२२८/१४३१, दि.११.०९.२०२० अन्वये व वित्त विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्र.१८३/२०२०/व्यय-१, दि.१७.०९.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२१११५९४३२१०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB K RASKAR

Digitally signed by BALASAHEB K RASKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=aaa93f4d4e49359ddfdb4a9eb4176d16d9032454ac5c700ad6e2a7ad0b3115db, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=2cf78d68ceeac33ca63c8a2f2b360ebf1c6ac77c6a1ad4c5bfb24951806af0a8, ou=AGRICULTURE DIARY AND FISHERTES DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=BALASAHEB K RASKAR
Date: 2020.09.21 12:01:31 +05'30'

**( बा. कि. रासकर )**
**उप सचिव (कृषि), महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.मंत्री (नियोजन व वित्त), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री (कृषि), मंत्रालय, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.राज्यमंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.मुख्य सचिव, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
६. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
८. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक / विद्यापीठ अभियंता, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी,
९. जिल्हाधिकारी, नाशिक,
१०. उपविभागीय कृषि अधिकारी, नाशिक,
११. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी/उप कोषागार अधिकारी, नाशिक,
१३. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,

१४. उप लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१७. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई,
१८. नियोजन विभाग (कार्यासन - १४३१), मंत्रालय, मुंबई,
१९. कार्यासन (७ अे) निवडनस्ती.